सन २०१७-१८ मध्ये वनतळे / सिमेंट बंधाऱ्याचे बांधकाम या राज्य योजनेअंतर्गत गोंदिया वन विभागामध्ये वनतळे / सिमेंट बंधाऱ्याचे बांधकामाचा नवीन बाब प्रस्ताव.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१७/प्र.क्र.९०/फ-२**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- २२ मे, २०१७

वाचा :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.०४.२०१७.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.३८/०७९७/२७६/२०१७-१८, दि.१७.०५.२०१७.

**प्रस्तावना :-**

राज्य योजना सन २०१७-१८ अंतर्गत "वनतळे / सिमेंट बंधाऱ्याचे बांधकाम (४४०६०७९७)" या योजनेकरिता रु.१६००.९९ लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित आहे.

२. सन २०१७-१८ या वर्षामध्ये अर्थसंकल्पित निधीच्या अनुषंगाने नागपूर वनवृत्तातील गोंदिया वन विभागामध्ये जलसंधारणाची कामे करण्याकरिता अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.२ येथील दि.१७.०५.२०१७ रोजीच्या पत्रान्वये रु.१६२.१६ लक्ष इतक्या रक्कमेचा प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला असून सदर कामांकरिता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :-

३. वित्त विभागाच्या दि.१८.०४.२०१७ रोजीच्या परिपत्रकातील सुचनांनुसार सन २०१७-१८ या वर्षामध्ये "वनतळे / सिमेंट बंधाऱ्याचे बांधकाम (४४०६०७९७)" या योजनांतर्गत योजनेकरिता अर्थसंकल्पित असलेल्या निधीपैकी **रु.१६२.१६ लक्ष (०२ मजुरी - रु.१२९.७२ लक्ष व पुरवठा व सामग्री - रु.३२.४४ लक्ष)** इतका निधी नागपूर वनवृत्तामधील गोंदिया वनविभागामध्ये वनतळे / सिमेंट बंधाऱ्यांची कामे करण्याकरिता मागील वर्षी वितरित केलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र सादर केले जाईल या अटीच्या अधिन राहून वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व

त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच मंजूर केलेल्या निधीच्या मर्यादेत कामे निश्चित करावीत. त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दि.१८.०४.२०१७ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तींची पूर्तता करण्यात येईल याची देखिल दक्षता घ्यावी.

५. सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र.सी-१०, प्रधान शीर्ष - ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, १०१ वनसंरक्षण विकास व पुनर्निर्मिती, (००)(०३) वनतळयांचे बांधकाम (४४०६०७९७) या लेखा शिर्षाखाली सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

६. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दि.१८.०४.२०१७ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ मधील भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५२४१४५१३९९९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.05.24 15:00:27 +05'30'

**( डि.एल.थोरात )**

सह सचिव, महसूल व वन विभाग

**प्रति :-** १) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

५) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.

६) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.

७) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

८) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.